विभागांतर्गत स्थापित महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्थेसाठी MRRDA संस्थेसाठी राज्यस्तरावर "वित्तिय नियंत्रक" या पदाची (Financial Controller) नियुक्ती करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**ग्रामविकास व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्र.ग्रासयो-२०१०/प्र.क्र.१४२/यो-८,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक :- ३० जून,२०११**

वाचा:- १)शासन निर्णय,ग्रामविकास व जलसंधारण विभाग क्र.ग्रासयो-२०१०/प्र.क्र.४५७/यो-९ दिनांक १६ मार्च, २००९

२) शासन निर्णय,ग्रामविकास व जलसंधारण विभाग क्र.ग्रासयो-२०१०/प्र.क्र.४५७/यो-९ दिनांक २२ जानेवारी, २००९

३)शासन निर्णय,ग्रामविकास व जलसंधारण विभाग क्र.ग्रासयो-२०१०/प्र.क्र.४५७/यो-९ दिनांक २३ ऑगस्ट, २०१०

**प्रस्तावना-**

१००% केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री ग्रामसडक योजना राज्यात सन २००० पासून राबविण्यात येत आहे. या योजनेची अंमलबजावणी प्रभावीपणे होण्यासाठी स्वतंत्रपणे अंमलबजावणीसाठी स्वतंत्रपणे अधिकारी / कर्मचारी वर्ग (Dedicated Staff) नियुक्त करावा असे केंद्र शासनाचे निर्देश आहेत. या अनुषंगाने वरील संदर्भाधीन शासन निर्णयान्वये पदे निर्माण करण्यात आली आहेत. त्यात वित्तिय नियंत्रक Financial Controller या पदाचा समावेश आहे. योजनेच्या लेखा विषयक बाबींच्या व्यवस्थापनासाठी वरिष्ठ लेखाधिकारी वित्तिय नियंत्रक (Financial Controller) म्हणून व Online Management Monitoring and Accounting System (OMMAS) च्या व्यवस्थापनासाठी वित्तिय नियंत्रक या पदाची नियुक्ती करणे आवश्यक आहे. Operation Manual परिच्छेद २.२.६ प्रमाणे "वित्तिय नियंत्रक" या पदासाठी आवश्यक असणारे शैक्षणिक अर्हता पुरेसे व्यांवसायिक अनुभव व ज्ञान असणे आवश्यक आहे. त्या अनुषंगाने सदर पद करार तत्वावर नियुक्त करण्याचा निर्णय घेण्यात आला.

**शासन निर्णय-**

वित्तिय नियंत्रक (Financial Controller) या पदासाठी सनदी लेखापाल या पदासाठी शैक्षणिक अर्हता, कामाचा अनुभव व योजनेमधील कामाचा अनुभव लक्षात घेता श्री. सुनिल चि. मोने सनदी लेखापाल यांची वित्तिय नियंत्रक (Financial Controller) या पदावर त्यांची निवड करण्यात आली. त्यांची १ वर्षासाठी करार पध्दतीने दिनांक ०१ जुलै, २०१० ते ३० जून २०११ पर्यत नियुक्ती करण्यात आली होती.श्री.सुनिल चि.मोने ,वित्तीय नियंत्रक ,प्रधानमंत्री ग्राम सडक योजना यांचा मागील

वर्षाच्या कामांचा अनुभव विचारात घेवून त्यांना यापुढे १ वर्षासाठी दिनांक १ जुलै २०११ ते ३० जून २०१२ या कालावधीसाठी वित्तीय नियंत्रक ,प्रधानमंत्री ग्राम सडक योजना या पदावर करार पध्दतीने नियुक्ती करण्यात येत आहे.

२. "वित्तिय नियंत्रक" (Financial Controller) या पदाची कर्तव्ये व जबाबदाऱ्या Operation Manual मधील विहित तरतुदीनुसार बंधनकारक राहतील.

३. प्रधानमंत्री ग्रामसडक योजना MRRDA या संस्थेकरिता हिशोबाची पुर्तता करुन केंद्र शासनास सादर करणे या करिता अंतर्गत हिशोब तपासणी नेमणूक करणे, वैधानिक लेखा परिक्षण करुन घेणे, संस्थेचे बँकिंग व्यवहार सांभाळणे, संस्थेच्या वेगवेगळया सभांना उपस्थित राहणे व वित्तिय मार्गदर्शन करणे. MoRD व NRRDA या संस्थांशी संपर्क ठेऊन पत्रव्यवहार करणे व योजनेसाठी लागणाऱ्या निधीची पुर्तता संबंधात प्रयत्न करणे, वित्तिय नियंत्रक या नात्याने OMMAS Online पध्दतीचे नियंत्रण करणे व इतर आवश्यक तेवढी कर्तव्ये पार पाडणे.

श्री. सुनिल चि. मोने यांचे मासिक एकत्रित मानधन पुढीलप्रमाणे राहिल.

| | |
|---|---|
| मानधन रुपये | २४०००/- |
| प्रवास भत्ता(मुंबईसाठी) | ३०००/- |
| टेलीफोन व इंटरनेट खर्च | ३०००/- |
| **एकूण :-** | **३००००/-** |

तसेच योजनेच्या कामी मुंबई बाहेरील येणारा (प्रत्यक्षात) प्रवासाचा खर्च देय राहिल.

४. सदर पदावरील येणारा खर्च राज्यस्तर मागणी क्र. एल-४, ३४५१ सेक्रेटरिएट आर्थिक सेवा ०९०-सेक्रेटरिएट (०१) (०१) ग्रामविकास व जलसंधारण विभाग (३४५१००८२) या लेखाशिर्षाखली यावर्षी मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०६३०१७०१९४९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( दि. ग. मोरे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत :-

मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई .

महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरिक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
मा. मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
सचिव (ग्राम विकास व पंचायती राज) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो) व तथा शक्तिप्रदान अधिकारी, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
कार्यकारी अभियंता (प्रमंग्रासयो) म.ग्रा.र.वि.सं,जिल्हा (सर्व)
अधीक्षक अभियंता (प्रमंग्रासयो), म.ग्रा.र.वि.सं, सर्व विभाग
राज्य गुणवत्ता समन्वयक, अण्णासाहेब मगर बिल्डिंग मार्केट यार्ड, गुलटेकडी, गेट नं. २, पुणे - ४११००३७
सह सचिव (आस्थापना) / उप सचिव (अर्थसंकल्प), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
आय.टी. नोडल अधिकारी तथा कार्यकारी अभियंता (प्रमंग्रासयो), नवीन प्रशासकीय भवन, तिसरा मजला, कौन्सिल हॉलसमोर, पुणे - ४११ ००१.
श्री .सुनिल चि.मोने, सदनी लेखापाल, वित्तीय नियंत्रक,प्रधानमंत्री ग्राम सडक योजना,बी-७०१, हेरिटेज प्लाझा तेली गल्ली,अंधेरी (पूर्व), मुंबई- ४०००६८
सामान्य प्रशासन विभाग / वित्त विभाग / सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२१
कक्ष अधिकारी/आस्थापना शाखा, ग्रामविकास व जलसंधारण विभाग
कक्ष अधिकारी (रोखशाखा), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
कक्ष अधिकारी (योजना-९), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
निवड नस्ती, कार्यासन योजना-८